**कुंडल वन प्रबोधिनी मध्ये सेवा करार पध्दतीने एक वर्ष मुदतवाढ देण्याबाबत.**
**श्री.डी.डी.गुजेला, भा.व.से. सेवा निवृत्त मुख्य वनसंरक्षक**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन आदेश क्र. संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०७/फ-९**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- २७ डिसेंबर, २०२१

वाचा :-

१. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक-२७१५/प्र.क्र.१००/१३, दिनांक १७.१२.२०१६
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक मवसे/मुले/करार नियुक्ती/ प्रक्र. ०६/१७-१८/कक्ष-९/३४०७/१८-१९, दिनांक २१.२.२०१९ व दिनांक १२.३.२०१९ चे पत्र.
३. महसूल व वन विभाग, शासन आदेश क्र.संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०७/फ-९, दिनांक ३०.०३.२०१९
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक:कक्ष-९/ भावसे /विवक्षित काम प्र.क्र.२/कक्ष-९/५५१/२०-२१, दिनांक ०५.०८.२०२०.
५. महसूल व वन विभाग, शासन आदेश क्र.संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०७/फ-९, दिनांक १४.१०.२०२०
६. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक:कक्ष-९/ भावसे /विवक्षित काम प्र.क्र.२/कक्ष-९/९८७/२१-२२, दिनांक ०७.०९.२०२१.

## शासन आदेश

वन विभागाच्या अधिपत्याखालील कुंडल वन प्रबोधिनी, मु.पो. कुंडल, ता.पलूस, जि.सांगली येथे प्रभावी प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्यासाठी अकादमीतील विवक्षीत कामाकरिता सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक १७.१२.२०१६ च्या आदेशातील अटी व शर्तीनुसार उपरोक्त संदर्भ क्र.५ च्या आदेशान्वये श्री.डी.डी.गुजेला, भा.व.से., सेवा निवृत्त मुख्य वनसंरक्षक यांची करार पध्दतीने १ वर्षाकरिता दिनांक ०१.०४.२०२० ते ३१.०३.२०२१ पर्यंत नियुक्ती करण्यात आली होती.

अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्या संदर्भ क्र.६ च्या पत्रान्वये श्री.गुजेला यांना पुढील एक वर्षासाठी मुदतवाढ देण्याचा प्रस्ताव विचाराधीन होता. त्यानुसार वन विभागाच्या अधिपत्याखालील कुंडल वन प्रबोधिनी, मु.पो. कुंडल, ता.पलूस, जि.सांगली येथे प्रभावी प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्यासाठी अकादमीतील विवक्षीत कामाकरिता **श्री.डी.डी.गुजेला, भा.व.से., सेवा निवृत्त मुख्य वनसंरक्षक यांच्या करार पध्दतीने केलेल्या नियुक्तीस दिनांक ०१.१२.२०२१ ते ३०.११.२०२२ पर्यंत** मुदतवाढ देण्यात येत आहे.

उक्त कराराच्या कालावधीत श्री.डी.डी.गुजेला, भा.व.से., सेवा निवृत्त मुख्य वनसंरक्षक यांना महागाई भत्यासह मिळत असलेल्या निवृत्तीवेतनाएवढी रक्कम (अंशराशीकृत निवृत्ती वेतन वगळून ) त्यांना मासिक पारिश्रमिक म्हणून देय व अनुदेय राहील.

श्री.डी.डी.गुजेला, यांच्या सेवा करार पध्दतीने घेण्यात येत असल्यामुळे त्यांना शासनाच्या कोणत्याही संवर्गात सेवा समावेशनाबाबत / सामावून घेण्याबाबतचे वा नियमित सेवेचे इतर कोणतेही लाभ मिळण्याचा अधिकार / हक्क राहणार नाही.

करार कालावधीत करार पध्दतीने विवक्षीत काम पूर्ण करण्याची जबाबदारी श्री.डी.डी.गुजेला यांची राहील त्या आशयाचे बंधपत्र / हमीपत्र त्यांनी वन विभागास सादर करावे.

श्री.डी.डी.गुजेला यांनी या पदांच्या अनुषंगाने Conflict of Interest जाहिर करणे आवश्यक राहील.

श्री.डी.डी.गुजेला यांनी त्यांच्यावर सोपविलेली सेवा पार पाडण्याच्या कामात व्यत्यय निर्माण होईल, अशा कोणत्याही व्यावसायिक कामात गुंतता कामा नये.

श्री.डी.डी.गुजेला यांनी त्यांना प्राप्त होणाऱ्या कागदपत्रे / माहिती व आधार सामुग्रीबाबत गोपनीयता पाळणे आवश्यक राहील.

श्री.डी.डी.गुजेला यांच्यावर सोपविलेले कामाकाज निश्चित केलेल्या कालावधीत पूर्ण करणे आवश्यक राहील. तसेच श्री.डी.डी.गुजेला यांच्या कामकाजाबाबत अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संशोधन, शिक्षण व प्रशिक्षण), पुणे व प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर वेळोवेळी आढावा घेऊन त्यांच्या कामाचे मूल्यमांपन करतील. त्याचप्रमाणे श्री.डी.डी.गुजेला यांच्या करार पध्दतीने घेण्यात आलेल्या सेवा समाप्त करण्याचे पूर्णअधिकार शासनास राहतील.

श्री.डी.डी.गुजेला यांना आवश्यक प्रसंगी दौरा करावा लागल्यास त्यांना प्रवास भत्ता व दैनिक भत्ता, वर नमूद शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग दि. १७.१२.२०१६ मधील १(ड) (३) नुसार अनुज्ञेय राहील.

श्री.डी.डी.गुजेला यांच्या पारिश्रमिकापोटी होणारा खर्च (२४१५ १०६८) या लेखाशीर्षाअंतर्गत सन २०२१-२२ या वित्तीय वर्षाकरिता मंजूर असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२२८१६५७१४९११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

GAJENDRA PRAKASH NARWANE

Digitally signed by GAJENDRA PRAKASH NARWANE
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=088951d0088e627aa56c9ab088add1677b8ac27d637c5cdf80b730f756dce9e8, cn=GAJENDRA PRAKASH NARWANE
Date: 2021.12.28 16:57:57 +05'30'

**( गजेंद्र नरवणे )**
**उप सचिव (वने)**
**महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर

३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (शिक्षण, प्रशिक्षण व संशोधन) म.रा. पुणे
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन-दुय्यम संवर्ग), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
५. मुख्य वनसंरक्षक (शिक्षण, प्रशिक्षण व संशोधन ) म.रा. पुणे.
६. संचालक, कुंडल विकास, व्यवस्थापन व प्रशिक्षण प्रबोधिनी, कुंडल.
७. फ-९ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२. (निवडनस्ती).